**उप सचिवांचे पद श्रेणी वाढ करुन सह सचिव पदात रुपांतरीत करणे व सदर रुपांतरीत पदावर श्रीम. अं. वि. अंभिरे, सह सचिव यांची नियुक्ती करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: आस्थाप्र-२०१७/प्र.क्र.१९४/आस्था-१,**

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२,

दिनांक: २१ जुलै, २०१७.

<u>वाचा:</u> १. सामान्य प्रशासन विभागाचे आदेश क्र.ससप-१११६/प्र.क्र.२९६/का.१४, दि.३१.०५.२०१७.

२. कार्यालयीन आदेश, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.आस्थाप्र-२०१७/ प्र.क्र.१९६/आस्था-१, दि.०८.०६.२०१७.

**शासन निर्णय:**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दि.३१.०५.२०१७ च्या आदेशांन्वये वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागातील श्रीम. अं. वि. अंभिरे, उप सचिव यांना सह सचिव पदावर आदेशाच्या दिनांकापासून तदर्थ पदोन्नती देण्यात आली असून त्यांची या विभागात पदस्थापना दर्शविण्यात आली आहे. त्यानुसार संदर्भ क्र.२ येथील विभागाच्या दि.०८.०६.२०१७ च्या आदेशांन्वये श्रीम. अं. वि. अंभिरे, उप सचिव यांना सह सचिव पदावर दि.०३.०६.२०१७ (म.पू.) पासून रुजू करुन घेण्यात आले आहे. तथापि, या विभागात सह सचिवांचे पद उपलब्ध नसल्याने उप सचिव संवर्गातील वेतनबँड रु.१५६००-३९१०० + ग्रेड पे रु.७६००/- मधील रिक्त पद वेतन बँड रु.३७४००-६७००० + ग्रेड पे रु.८७००/- मध्ये श्रेणी वाढ करुन दि.०३.०६.२०१७ (म.पू.) पासून सह सचिव या पदात रुपांतरीत करण्यात येत आहे. रुपांतरीत झालेल्या सदर पदावर श्रीम. अं. वि. अंभिरे, सह सचिव यांची दि.०३.०६.२०१७ (म.पू.) पासून पदस्थापना करण्यात येत आहे. सह सचिव पदात श्रेणीवाढ केलेले पद श्रीम. अं. वि. अंभिरे, सह सचिव ह्या त्या पदावर कार्यरत असेपर्यंतच अस्तित्वात राहील, त्यानंतर ते पद आपोआप मूळ पदामध्ये रुपांतरीत व श्रेणी अवनत होईल.

२. यावरील होणारा खर्च सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर झालेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक: १९५/२०१७/सेवा ९, दि.१०.०७.२०१७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२४१६१५५०८०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2017.07.24 16:23:42 +05'30'

(ज्ञा. ल. सुळ)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. श्रीम. अं. वि. अंभिरे, सह सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. अवर सचिव (लेखाशाखा), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उप सचिव (का.१४), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. उप सचिव (का.सेवा-९), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. मा.सचिव यांचे स्वीय सहायक, सा. न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (का.आस्था-१).